मौजे चिकलठाणा जि. औरंगाबाद येथील अंडीपुंज निर्मिती केंद्राची इमारत, प्रशासकीय इमारत, कोल्ड स्टोरेज इमारत, कर्मचारी निवासस्थाने, चॉकी संगोपन केंद्र, किटक संगोपन केंद्र व शेतकरी निवासी प्रशिक्षण केंद्र इ.सोई सुविधा उभारणी प्रकल्पाकरिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राावियो-२०१९/प्र.क्र.४३/रेशीम कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांकः प्रावियो-१०१८/ प्र.क्र.४५/रेशीम कक्ष, दिनांक ०३ मे, २०१८.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांकः प्रावियो-१०१८/ प्र.क्र.४५/रेशीम कक्ष, दिनांक २६ जुलै, २०१८.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांकः प्रावियो-२०१९/ प्र.क्र.४३/रेशीम कक्ष , दिनांक ०६ मार्च, २०२३.
६) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्या-८/चि.अं.नि.कें/ औरगाबाद/२२८७, दिनांक ०८ मार्च, २०२३.

**प्रस्तावना :-**

राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम उद्योगाला चालना देण्यासाठी पायाभूत सुविधांची निर्मिती व अस्त्विात्वातील सुविधांचे बळकटीकरण करणे या कार्यक्रमांतर्गत मौजे चिकलठाणा जि. औरंगाबाद येथील अंडीपुंज निर्मिती केंद्राची इमारत, प्रशासकीय इमारत, कोल्ड स्टोरेज इमारत, कर्मचारी निवासस्थाने, चॉकी संगोपन केंद्र, किटक संगोपन केंद्र व शेतकरी निवासी प्रशिक्षण केंद्र इ.सोई सुविधा उभारण्यासाठी येणाऱ्या ₹२८०४.८६ लक्ष इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन दि. ०६ मार्च, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे त्यास अनुसरून संचालक (रेशीम) यांनी उक्त प्रकल्पासाठी दि.०८ मार्च, २०२३ रोजीच्या पत्रान्वये निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे. रेशीम विकास कार्यक्रमांतर्गत पायाभूत सुविधा निर्माण करणे व अस्तित्वातील सुविधांचे बळकटीकरण योजनेकरिता सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी ₹१०.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील

शासन परिपत्रकान्वये सन २०२२-२३ साठी महसूली लेख्यातील उद्दिष्टांसाठी अर्थसंकल्पीत केलेल्या वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत सुधारीत अंदाजानुसार ₹७००.०० लक्ष इतका निधी निश्चित केला आहे. सदर निधीपैकी आतापर्यत चालू आर्थिक वर्षात ₹१६८.४६ लक्ष इतका निधी संचालक (रेशीम) यांना उपलब्ध करुन देण्यात आला आहे. एकूण सुधारीत अंदाजानूसार विभागाकडे ₹५३१.५४ लक्ष (₹७००.००-₹१६८.४६) इतका निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यास अनुसरुन संचालक (रेशीम) यांच्या दि.०८ मार्च, २०२३ रोजीच्या प्रस्तावानुसार उक्त निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याची विनंती नियोजन व वित्त विभागास करण्यात आली असता सदर प्रकल्पासाठी सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत शिल्लक निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता प्रदान केली आहे. तथापि, केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र योजनेंतर्गत राज्य हिस्सा (२८५१ १२०४) ३१ सहायक अनुदाने या अंतर्गत केंद्र हिस्साच्या तुलनेत राज्य हिस्सा ₹०.५९ लक्ष कमी पडत असल्याने सदर निधी पुर्ननिनियोजनाने उपलब्ध करुन देण्याची विनंती नियोजन व वित्त विभागास करण्यात आली आहे. त्यामुळे सदर योजनेसाठी पुर्नविनियोजनाने उपलब्ध करावयाची रक्कम वजा जाता ₹५३०.९५ लक्ष ( ₹५३१.५४-₹०.५९) इतका निधी वितरणासाठी उपलब्ध होत आहे. सबब, संचालक (रेशीम) यांनी केलेल्या विनंतीनुसार उक्त प्रकल्पासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

रेशीम उद्योगाला चालना देण्यासाठी पायाभूत सुविधांची निर्मिती व अस्त्विात्वातील सुविधांचे बळकटीकरण करणे या कार्यक्रमांतर्गत मौजे चिकलठाणा जि. औरंगाबाद येथील अंडीपुंज निर्मिती केंद्राची इमारत, प्रशासकीय इमारत, कोल्ड स्टोरेज इमारत, कर्मचारी निवासस्थाने, चॉकी संगोपन केंद्र, किटक संगोपन केंद्र व शेतकरी निवासी प्रशिक्षण केंद्र इत्यादी सोयी सुविधा उभारण्याबाबतच्या प्रकल्पासाठी ₹५३०.९५ लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी तीस लक्ष पंच्चाण्णव हजार फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त निधी हा ज्या कामांसाठी उपलब्ध करुन दिला आहे त्याच कामांवर व प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेच्या मर्यादेत खर्च करण्याची तसेच, सदर प्रकल्प वेळेत पूर्ण होईल याची संबंधित यंत्रणांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाने तसेच, सार्वजनिक बांधकाम विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास विहीत मुदतीत सादर करण्यात यावे.

४. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी सदर कार्यक्रमांतर्गत वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीस अधिन राहून सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत उक्त निधी अर्थसंकल्पिय प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

५. उक्त खर्च हा "मागणी क्र. व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०७, रेशीम उद्योग, (०१) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०१)(०२) राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम विकास कार्यक्रमांतर्गत पायाभूत सुविधा निर्माण करणे व अस्तित्वातील सुविधांचे बळकटीकरण (कार्यक्रम) (२८५११६५८३), ३३, अर्थसहाय्य" अंतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी संचालक, रेशीम संचालनालय,नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V००३) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संचालक,रेशीम संचालनालय, नागपूर यांचे अधिनस्थ सुपूर्द करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय हा नियोजन विभागाचे सहमतीने व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.२७५/ व्यय-२, दि.२८.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१६४८५०९००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ALKA V JAGTAP

Digitally signed by ALKA V JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA V JAGTAP
Date: 2023.03.29 16:53:50 +05'30'

**( अलका वि. जगताप )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य , मुंबई
३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) उप सचिव ( अर्थसंकल्प) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.

११) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औंरगाबाद
१२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औंरगाबाद.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद / नागपूर
१४) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) उप संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद
१६) रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-१, जिल्हा रेशीम कार्यालय, औरंगाबाद
१७) निवड नस्ती (रेशीम कक्ष).